जलसंपदा विभागातील उप अभियंता व तत्सम यांच्या गोपनीय अहवालातील पदोन्नतीच्या पात्रतेपर्यंत न पोहोचणाऱ्या प्रतवारी संदर्भात करावयाची कार्यवाही.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः गोपअ-२०१४/(७८/१४)/गो.का.
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २८ ऑक्टोबर, २०१४

वाचा :

१) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग,क्रमांक: गोअसं-१०९६/(५९/९६)/गो.का., दिनांक २० जानेवारी, २०००
२) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांकः संकिर्ण-२०१२/(३/१२)/गो.का., दिनांक ९ एप्रिल,२०१२
३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकः न्यायप्र-२०१३/प्र.क्र.२६/२०१३/तेरा, दिनांक १३ फेब्रुवारी, २०१४

परिपत्रक :

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १३ फेब्रुवारी, २०१४ मधील तरतुदींनुसार यापुढे कोणत्याही प्रकरणांमध्ये निवडसूची तयार करतांना सन २०११-१२ पूर्वीचे ज्या वर्षाचे गोपनीय अहवाल विचारात घेतले जाणार असतील, अशा गोपनीय अहवालापैकी ज्या गोपनीय अहवालातील अंतिम प्रतवारी पदोन्नतीच्या पात्रतेपर्यंत पोहोचणारी नसेल असे गोपनीय अहवाल पदोन्नतीसाठी विचारात घेण्यापूर्वी अशा गोपनीय अहवालाच्या प्रती संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांना त्यावर अभिवेदन करण्याच्या संधीसाठी उपलब्ध करुन द्यावयाच्या आहेत व यानुसार प्राप्त अभिवेदनावर संबंधीत प्रतिवेदन/पुनर्विलोकन अधिकारी यांचे अभिप्राय विचारात घेऊन पदोन्नतीच्या पात्रतेपर्यंत न पोहोचणाऱ्या शेऱ्यांसंदर्भातील उचित निर्णय सक्षम प्राधिकाऱ्याने घ्यावयाचा आहे.

२. शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, दिनांक ९/४/२०१२ अन्वये जलसंपदा विभागातील उप अभियंता ते कार्यकारी संचालक/महासंचालक यांच्या संदर्भात संस्करण अधिकारी घोषित केले असून, उप अभियंता व तत्सम यांच्या संदर्भात संबंधीत मुख्य अभियंत्यांना संस्करण अधिकारी म्हणून घोषित केलेले आहे.

३. शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, दिनांक २०/१/२००० मधील तरतुदींनुसार उप अभियंता व तत्सम यांच्या गोपनीय अहवालातील प्रतिकूल शेऱ्यांवरील अभिवेदनाच्या संदर्भात निर्णय घेण्यास संबंधीत कार्यकारी संचालक/महासंचालक व मुख्य अभियंता सक्षम आहेत. मात्र प्रतिकूल शेरे न वगळण्यासंदर्भात सक्षम प्राधिकाऱ्याने निर्णय घेतल्यास, सदर संपूर्ण प्रकरण सक्षम प्राधिकाऱ्यांच्या अभिप्रायांसह अंतिम निर्णयासाठी शासनाकडे सादर करण्याची तरतूदही सदर परिपत्रकामध्ये समाविष्ट केलेली आहे.

४. या पार्श्वभूमीवर सर्व कार्यकारी संचालक/महासंचालक, मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांना सूचना देण्यात येत आहेत की, त्यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व उप अभियंता व तत्सम यांच्या सन २००८-०९ व त्यापुढील दोन वर्षाच्या गोपनीय अहवालाचा आढावा घेऊन सदर गोपनीय अहवालाची प्रतवारी पदोन्नतीच्या पात्रतेपर्यंत पोहोचत नसल्यास, अशा गोपनीय अहवालाची प्रत संबंधितांना देवून, तत्संदर्भातील पुढील कार्यवाही शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १३/२/२०१४ व शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, दिनांक २०/१/२००० मधील निदेशांनुसार करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४१०२८१५२९२२४४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajshekhar C Patil

Digitally signed by Rajshekhar C Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajshekhar C Patil
Date: 2014.10.28 15:44:38 +05'30'

(रा. चं. पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सर्व कार्यकारी संचालक/महासंचालक, जलसंपदा विभाग
२. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
३. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग